**वार्षिक आदिवासी घटक कार्यक्रम २०२४-२५ अंतर्गत केंद्र पुरस्कृत योजनांचा निधी वितरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः** बीयुडी-२०२४/प्र.क्र.०२/ कार्यासन-६
विस्तार इमारत, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
तारीख: ०१ ऑगस्ट, २०२४

वाचा -

१) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. संकीर्ण-१०१८/प्र.क्र.४६/अर्थोपाय, दि. १८ मे, २०२०
२) केंद्र शासनाच्या अर्थ मंत्रालयाचे पत्र क्रमांकः F.No.१(१३)/PFMS/२०२०, दि. १६.०२.२०२३
३) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्रमांकः संकीर्ण-१०१८/क्र.४६/अर्थोपाय, दि. ०५ डिसेंबर, २०२३
४) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्रमांक : अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३, दि. ०१ एप्रिल, २०२४
५) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्रमांकः अर्थसं-२०२४/क्र.८०/अर्थ-३, दि. २५ जुलै, २०२४

**परिपत्रक**

केंद्र पुरस्कृत योजनांसदर्भात केंद्र शासनाकडून प्राप्त झालेला केंद्र हिश्शाचा निधी व समरुप राज्य हिश्शाचा निधी विहित मुदतीत सिंगल नोडल खात्यात (SNA) वर्ग करण्याबाबत वित्त विभागाने संदर्भ क्र. (०३) येथील दि. ०५ डिसेंबर, २०२३ च्या शासन परिपत्रकान्वये आवश्यक सूचना दिल्या आहेत. आता, वित्त विभागाने संदर्भ क्र. (०५) येथील शासन परिपत्रकान्वये केंद्र पुरस्कृत योजनांसाठी प्रथम नऊमाहीकरिता (डिसेंबर, २०२४ अखेर) केंद्र हिस्सा व समरुप राज्य हिस्सा निधी एकूण अर्थसंकल्पीय तरतूदीच्या ६० टक्केच्या मर्यादेत बीम्स प्रणालीवर वितरीत केला आहे.

**२. या पार्श्वभूमीवर आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत केंद्र पुरस्कृत योजनांसाठी प्रथम नऊमाहीकरिता (डिसेंबर, २०२४ अखेर) केंद्र हिस्सा व समरुप राज्य हिस्सा निधी एकूण अर्थसंकल्पीय तरतूदीच्या ६० टक्के मर्यादेत बीम्स प्रणालीवर वितरीत करण्यात येत आहे.**

**३.** या अनुषंगाने वित्त विभागाच्या संदर्भ क्र. (०३) येथील दि. ०५ डिसेंबर, २०२३ च्या शासन परिपत्रकातील सूचना विचारात घेऊन, आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत प्राप्त होणाऱ्या केंद्र पुरस्कृत योजनांच्या निधी वितरणाबाबत आवश्यक ती कार्यवाही करावी :-

१) संबंधित मंत्रालयीन प्रशासकीय विभागाच्या अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव यांनी केंद्र शासनाकडून वितरीत करण्यात आलेल्या निधीबाबतचा वितरण आदेश केंद्र शासनाकडून मिळवून सदर निधी राज्याच्या एकत्रित निधीत जमा झाल्याची खातरजमा वित्त विभागाच्या अर्थोपाय शाखेकडून प्रत्येक कार्यालयीन दिवशी त्या विभागास पाठविण्यात येणाऱ्या ई-मेलच्या आधारे त्यांच्या स्तरावरच करुन घेण्यात यावी. आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत ज्या योजनांच्या बाबतीत केंद्र शासनाकडून वितरीत झालेला निधी राज्याच्या एकत्रित निधीत प्राप्त झाला असेल, अशा योजनांच्या बाबतीत सदर केंद्र हिश्शाचा निधी

त्यास समरुप राज्य हिश्शाच्या निधीसह सिंगल नोडल खात्यावर वर्ग करण्यासाठी तात्काळ वितरीत करण्यात यावा व केंद्र शासनाने दि. १६ फेब्रुवारी, २०२३ च्या पत्रान्वये विहित केल्यानुसार केंद्र शासनाकडून प्राप्त सदर निधी राज्याच्या एकत्रित निधीत जमा झाल्यापासून ३० कॅलेंडर दिवसांमध्ये समरुप राज्य हिश्शासह निधी संबंधित योजनेच्या सिंगल नोडल खात्यावर (SNA) जमा केला जाईल, याची दक्षता घ्यावी.

२) याकरिता केंद्र शासनाकडून निधी प्राप्त झाल्यानंतर १० दिवसांच्या कालावधीत निधी वितरणाचे आदेश निर्गमित केले जातील व कोषागारात देयक सादर करुन कोणत्याही परिस्थितीत ३० कॅलेंडर दिवसांपूर्वी असा निधी संबंधित योजनेच्या सिंगल नोडल खात्यामध्ये जमा केला जाईल, याची खातरजमा संबंधित प्रशासकीय विभागामार्फत करण्यात यावी.

३) यानुसार कार्यवाही करण्याची तसेच, केंद्र शासनाचा निधी राज्याच्या एकत्रित निधीत प्राप्त झाल्याशिवाय निधी वितरीत केला जाणार नाही, याची दक्षता घेण्याची संपूर्ण जबाबदारी संबंधित मंत्रालयीन प्रशासकीय विभागांच्या अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव यांची राहिल.

४) केंद्र पुरस्कृत योजनांसाठी वितरीत निधीपेक्षा अधिक निधीची आवश्यकता असल्यास, तसेच मागील वर्षामधील केंद्र शासनाचा निधी चालू वर्षी खर्च करावयाचा असल्यास त्यास आवश्यकतेनुसार यथास्थिती आदिवासी विकास विभाग तसेच, वित्त विभागाची सहमती घेणे अनिवार्य राहील.

५) केंद्र शासनाच्या दि. १६ फेब्रुवारी, २०२३ च्या पत्रामध्ये नमूद केल्यानुसार व्याज प्रदान करावे लागल्यास, त्याची संपूर्ण जबाबदारी संबंधित मंत्रालयीन प्रशासकीय विभागाची राहिल.

४. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०८०११२४२२२३१२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VIJESING FATTESING VASAVE

Digitally signed by VIJESING FATTESING VASAVE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=5494d2ad3a3bc5ddd66daf9a8f17cee c5e2d7d4b6a8bba99c51d275801bcdf1b, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=2182F4F20DAA6841AB430B2F D812E7B5D3A883E72EFA574CA5E29FF528BC 8015, cn=VIJESING FATTESING VASAVE
Date: 2024.08.01 15:43:25 +05'30'

**(विजेसिंग फ. वसावे)**
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.विरोधी पक्षनेता (विधानपरिषद/ विधानसभा), महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.

४. मा. उप मुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे सह सचिव, मुंबई.
५. मा. मंत्री (आदिवासी विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. सर्व मा. विधानसभा/ विधानपरिषद सदस्य, विधानमंडळ, मुंबई.
७. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
८. सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक.
९. अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव
   - सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई
   - सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई
   - शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
   - कृषि विभाग, मंत्रालय, मुंबई
   - पशुसंवर्धन व मत्स्य व्यवसाय, मंत्रालय, मुंबई
   - वन विभाग, मंत्रालय, मुंबई
   - ग्राम विकास व पंचायती राज विभाग, मंत्रालय, मुंबई
   - पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई
   - ऊर्जा विभाग, मंत्रालय, मुंबई
   - उद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
   - मृद व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई
   - नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
   - परिवहन विभाग, मंत्रालय, मुंबई
   - कौशल्य विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
   - सहकार विभाग, मंत्रालय, मुंबई

१०.प्रधान महालेखापाल-१ (लेखा व परिक्षा), महाराष्ट्र, मुंबई
११.प्रधान महालेखापाल- २ (लेखा व परिक्षा), महाराष्ट्र, नागपूर
१२.संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई-३२
१३.अधिदान व लेखाधिकारी, मुंबई-३२
१४.निवासी लेखाधिकारी, मुंबई-३२
१५.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी, मुंबई-३२
१६.सर्व उप सचिव/ अवर सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१७. सर्व कक्ष अधिकारी, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१८. निवड नस्ती, कार्यासन-६, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई